**विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.२७५/मशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- १५मार्च २०२४.

**वाचा:**

१) शासन आदेश क्रमांक संकीर्ण-२०२२/ प्र.क्र.२७५/मशि-१,दिनांक ०१.०२.२०२३.
२) शासन आदेश क्र. संकिर्ण -२०२२/प्र.क्र.२७५/मशि-१ दिनांक ०३.११.२०२३.
३) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचे पत्र क्र.उशिसं/प्रशा-१/टेक्र./संकिर्ण/ससं कार्यभार दि.०७.०३.२०२४

**शासन आदेश**

संदर्भाधीन क्र.१ येथील शासन आदेशान्वये विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर या पदाचा अतिरिक्त कार्यभार डॉ. सुरेंद्र ठाकुर, सहयोगी प्राध्यापक, शासकीय ज्ञान विज्ञान महाविद्यालय, छत्रपती संभाजीनगर यांच्याकडे सोपविण्यात आला होता. तसेच संदर्भाधीन क्र. २ येथील आदेशान्वये विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, अमरावती विभाग, अमरावती या पदाचा कार्यभार डॉ. उमेश भाऊरावजी काकडे, सहयोगी प्राध्यापक, शासकीय विज्ञान संस्था, मुंबई यांचे कडे सोपविण्यात आला होता.

२. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, छत्रपती संभाजीनगर व विभागीय सहसंचालक, अमरावती या पदांच्या अतिरिक्त कार्यभारामध्ये प्रशासकीय कारणास्तव पुढीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे.

३. नव्याने विभागीय सहसंचालक पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांचा तपशिल "प्रपत्र-अ" येथे नमूद केला आहे. यानुसार अतिरिक्त कार्यभाराबाबतचे नवीन आदेश निर्गमित होत असल्याने ज्या विभागीय सहसंचालकांचा अतिरिक्त कार्यभार याव्दारे संपूष्टात आणण्यात येत आहे, त्याचा तपशिल "प्रपत्र- ब" येथे नमूद केला आहे.

४. उपरोक्त प्रमाणे सोपविण्यात आलेला अतिरिक्त कार्यभार अत्यंत तात्पुरत्या स्वरूपात पुढील आदेशापर्यंत चालू राहील.

५. उपरोक्त प्रपत्र-अ येथे नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून उमेदवार उपलब्ध होईपर्यंत किंवा इतर कोणत्याही कारणास्तव पुढील शासन आदेश होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल, त्या कालावधीकरिता त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण या पदावर अतिरिक्त कार्यभाराने तात्पुरती पदस्थापना करण्यात येत आहे.

६. विभागीय सहसंचालक पदांचा अतिरिक्त कार्यभार धारण करणारे प्राध्यापक/सहयोगी प्राध्यापक/वरिष्ठ प्रशासन अधिकारी सध्या ज्या वेतनश्रेणीत वेतन घेतात त्याच वेतनश्रेणीतील वेतन व भत्ते त्यांना अनुज्ञेय राहतील, व सदरहू वेतन व भत्ते त्यांना त्यांच्या मुळ आस्थापनेवरुन अदा करण्यात येतील.

७. सदर आदेश प्राप्त होताच नव्याने विभागीय सहसंचालक पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविलेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या कार्यालय प्रमुखांनी तात्काळ कार्यमुक्त करावे आणि संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या नावापुढे दर्शविण्यात आलेल्या विभागीय सहसंचालक पदाचा अतिरिक्त कार्यभार पुढील आदेश होईपर्यंत तात्काळ स्विकारावा. याबाबतचा अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास सादर करावा.

८. संचालक उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी "प्रपत्र- ब" येथील अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करुन ते त्यांच्या मूळ आस्थापनेवरील पदावर रुजू झाल्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३१५२०२८३५१५०८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ASHOK S MANDE

Digitally signed by ASHOK S MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK S MANDE
Date: 2024.03.15 20:37:58 +05'30'

**(अशोक मांडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
५. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे
७. सर्व सहसचिव/उपसचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
९. आदेशात नमूद संबंधित (संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत)
१०. संचालक, शासकीय न्यायसहाय्यक विज्ञान संस्था, छत्रपती संभाजीनगर
११. प्राचार्य, शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती
१२. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
१३. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई
१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१५. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती/छत्रपती संभाजीनगर
१७. सर्व कार्यासने, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. निवडनस्ती (मशि-१)

**प्रपत्र-अ**

**(नव्याने अतिरिक्त कार्यभार देण्यात येत असलेले अधिकारी)**

| अ. क्र. | नाव, पदनाम व महाविद्यालय/कार्यालय | अतिरिक्त कार्यभाराचे ठिकाण |
|---|---|---|
| १. | डॉ. रणजित निंबाळकर, प्राध्यापक, शासकीय न्यायसहाय्यक विज्ञान संस्था, छत्रपती संभाजीनगर | विभागीय सहसंचालक,उच्च शिक्षण, छत्रपती संभाजीनगर विभाग, संभाजीनगर |
| २. | डॉ. सुबोध एकनाथराव भांडारकर, सहयोगी प्राध्यापक, शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती | विभागीय सहसंचालक,<br>उच्च शिक्षण, अमरावती विभाग,अमरावती. |

**प्रपत्र-ब**

**(कार्यभार संपुष्टात आणण्यात येत असलेले अधिकारी)**

| अ. क्र. | नाव, पदनाम व महाविद्यालय/कार्यालय | पदस्थापना संपुष्टात आणण्यात आलेले ठिकाण |
|---|---|---|
| १. | डॉ. सुरेंद्र ठाकुर, सहयोगी प्राध्यापक, शासकीस ज्ञान विज्ञान महाविद्यालय, छत्रपती संभाजीनगर | विभागीय सहसंचालक,उच्च शिक्षण, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर |
| २. | डॉ. उमेश भाऊरावजी काकडे, सहयोगी प्राध्यापक, शासकीय विज्ञान संस्था, मुंबई | विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, अमरावती विभाग, अमरावती |

ASHOK S MANDE

Digitally signed by ASHOK S MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK S MANDE
Date: 2024.03.15 20:38:35 +05'30'

**(अशोक मांडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**